**रमाई आवास घरकुल योजनेंतर्गत लाभार्थ्यांसाठी असलेली दारिद्रय रेषेच्या खालील लाभार्थी असण्याची अट अपंग लाभार्थ्यांसाठी शिथिल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

# शासन निर्णय क्रमांकः रआयो-२०१५ /प्र. क्र.४२० /बांधकामे

कक्ष क्र.१४०, पहिला मजला, मंत्रालय विस्तार,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु मार्ग
मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३१ डिसेंबर,२०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय क्र.बीसीएच-२००८/ प्र.क्र.३६/ मावक-२, दिनांक १५.११.२००८.**

२) **शासन निर्णय क्र.बीसीएच-२००९/ प्र.क्र.१५९/ मावक-२, दिनांक ९.३.२०१०.**

प्रस्तावना :-

१. राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील लोकांचे राहणीमान उंचावणे व त्यांच्या निवाऱ्याच्या प्रश्न सुटावा म्हणून ग्रामीण व शहरी भागामध्ये त्यांच्या स्वत:च्या जागेवर अथवा कच्च्या घराच्या ठिकाणी पक्के घर बांधून देण्यासाठी शासनाने अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना शासन निर्णय दिनांक १५.११.२००८ अन्वये सुरु केली आहे व सदर योजनेमध्ये शासन निणर्य दि.९.३.२०१० अन्वये सुधारणा करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अटी व शर्तीमध्ये प्रामुख्याने ग्रामीण भागातील लाभार्थी हा दारिद्रय रेषेखालील असावा ही प्रमुख अट आहे. अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील अपंगांकरीता ते दारिद्रय रेषेखालील नसल्यामुळे अनेक वेळा त्यांना घरकुलाचा लाभ देणे शक्य होत नाही. त्यामुळे अनुसूचित जातीतील अपंग लाभार्थ्यांसाठी ते दारिद्रय रेषेखालील असण्याची अट शिथिल करण्याबाबत लोकप्रतिनिधींनी वारंवार शासनाकडे पाठपुरावा केला आहे. त्यास अनुसरुन मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निदेशानुसार या विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या रमाई आवास घरकुल योजनेत अपंग लाभार्थ्यांना घरकुलाचा लाभ मिळण्यासाठी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

२. रमाई आवास घरकुल योजनेअंतर्गत घरकुलाचा लाभ मिळणेकरीता अनुसूचित जातींमधील जे अपंग लाभार्थी दारिद्रय रेषेखाली नाहीत, ज्यांचे अपंगत्व ४०% पेक्षा अधिक आहे व वार्षिक उत्पन्न एक लाखापर्यंत आहे, अशा अपंग लाभार्थ्यांना, ते योजनेच्या उर्वरित अटी व शर्तींची पूर्तता करीत असल्यास, त्यांना रमाई आवास घरकुल योजनेचा लाभ देण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१५०८०५१७१२२०४८२२ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=SJ And SA, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2016.01.01 17:22:26 +05'30'

**(चंद्रकांत ह.वडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व मा. राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय.
१२) सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग विकास महामंडळ, मुंबई
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाकल्याण विभाग
१६) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
१७) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हापरिषद